वर्धा-यवतमाळ-नांदेड या नवीन रेल्वे मार्गाकरीता रु.११७.३३ कोटी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. आरएलवाय-१०२१/प्र.क्र.१३३/परिवहन-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २२ डिसेंबर, २०२१

**वाचा :** १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/१०५८/प्र.क्र.२१३/परि.५, दिनांक : १९ फेब्रुवारी, २०१०.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-२०१५/प्र.क्र.१९/भाग-१/रेल्वे कक्ष, दिनांक : १४ जुलै, २०१५
३) गृह विभाग, शासन निर्णय दिनांक ३०.०३.२०१३, १९.०३.२०१४, ३१.०३.२०१५, २४.०६.२०१६, ०६.१०.२०१६, १५.०३.२०१७, २२.०३.२०१७, १०.०८.२०१८, १९.०१.२०१९ व १३.०२.२०१९, १६.१२.२०२०, १२.०२.२०२१ व २६.०३.२०२१.
४) मुख्य प्रशासकीय अधिकारी (निर्माण), मध्य रेल्वे, मुंबई यांचे दिनांक ०१.०९.२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

वर्धा-यवतमाळ-नांदेड या नवीन रेल्वेमार्गाकरीता रू.२५०१.०५ कोटी एवढा खर्च अंदाजित असून उक्त खर्चापैकी रू.१०००.४२ कोटी एवढा ४० टक्के हिस्सा राज्य शासनाकडून केंद्रीय रेल्वे बोर्डास उपलब्ध करून देण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. या प्रकल्पासाठी दिनांक ३१.०३.२०२१ पर्यंत केंद्र शासनाने रु.१०२५.९६ कोटी खर्च केला असून सन २०२१-२२ या वर्षाकरिता रेल्वेने रु.२५५.०१ कोटी इतकी तरतूद केली असल्याने रेल्वेने राज्य हिश्श्याची फरकाची रु.२७९.३६ कोटी रक्कम अदा करण्याबाबत संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये कळविले आहे. सदर प्रकल्पामधील ४०% हिश्श्यानुसार या रेल्वे मार्गाकरिता राज्य शासनाने दिनांक ३१.०३.२०२१ अखेरपर्यंत संदर्भ क्र.३ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयांन्वये रु.५७४.६२ कोटी इतका निधी उपलब्ध करून दिला आहे. सन २०२१-२२ करिता या प्रकल्पासाठी मध्य रेल्वेने मागणी केलेल्या रक्कमेपैकी रु.११७.३३ कोटी निधी रेल्वेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी (Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction) Mumbai CST), मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई-४०० ००१ यांना प्रस्तावनेत नमूद प्रयोजनासाठी रु.११७.३३ कोटी (रुपये एकशे सतरा कोटी तेहतीस लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास राज्य शासन या निर्णयाव्दारे मंजूरी देत आहे.

२. शासनाने उप सचिव/सह सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले असून या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी येणारा खर्च सन २०२०-२१ या वर्षात मागणी क्र.बी-७, ३००१ भारतीय रेल्वे धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, ००, ८००-इतर खर्च, (००), (००) (०२)-रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य

शासनाचा सहभाग (३००१ ००५४), ३२-अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. महाराष्ट्र शासन, वित्त विभाग, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून २०२१ व १४ ऑक्टोबर २०२१ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर देयकांन्वये आहरीत करण्यात येणा-या रक्कमेचे स्वरुप “अंशदाने” या तपशीलवार शिर्षाखाली येते. त्यानुसार तपासणी करावयाच्या सुचीत नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून २०२१ व १४ ऑक्टोबर २०२१ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील क्रमांक १ ते १० मधील अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३६/१४६१, दिनांक ११.११.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८७/२०२१/व्यय-८, दिनांक ०३.१२.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२२१४५९४५४९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2021.12.22 15:00:59 +05'30'

**( रा. मो. होळकर )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
२) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली.
३) महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई / दक्षिण मध्य रेल्वे, सिकंदराबाद.
४) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई.
५) मुख्य अभियंता (बांधकाम), उत्तर मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८) बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (व्यय-८/बीयुडी-११), मंत्रालय, मुंबई.
१०) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
११) रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कमेचा धनादेश Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction), Mumbai CSMT यांच्या नावाने काढण्यात यावा.
१२) निवड नस्ती, परिवहन-५.